

# लाल तुरेवाला कोंबडा

अलेक्सेई तोल्स्तोय यांनी सांगितलेली
रशियन लोककथा





कोणे एके काळची कथा. एक मांजर, एक गाणारा पक्षी आणि एक कोंबडा असे तिघे एकत्र रहात होते. जंगलात त्यांची एक छोटीशी झोपडी होती. दररोज मांजर आणि गाणारा पक्षी खूप दूरवर रानात लाकडे तोडायला जात व कोंबड्याला घरात बसवून ठेवीत.

जंगलात जाण्यापूर्वी ते कोंबड्याला कडकपणे बजावून सांगत:

"आम्ही खूप लाब जातोय, तेव्हा तू घरात रहा आणि घर सांभाळ. आणि जर कोल्ही आली तर अगदी चिडीचूप बसून रहा, खिडकीमधून अजिबात बाहेर डोकावू नकोस."





पण मांजर आणि गाणारा पक्षी असे दोघे दूर गेल्याचा कोल्हीला सुगावा लागला. ती घाईघाईने झोपडीजवळ आली व खिडकीच्या खाली बैठक मारून तिने गाणे म्हणायला सुरुवात केली:

"कोंबडोबा कोंबडोबा
लाल तुरा तुझा छान,
पांढरीशुभ्र तुझी छाती
दाढी सुरेख रेशीमपोती,
दावशील मुखडा तुझा देखणा
तर देते पसाभर वाटाणा!"

झाले! खूष होऊन कोंबडयाने आपला मुखडा खिडकीबाहेर काढला न काढला तोच कोल्हीने त्याच्यावर झडप घातली व त्याला बकोटीत धरून आपल्या बिळाकडे निघाली.

आणि कोंबडयाने घाबरून एकच आकांत मांडला:

"धावा हो धावा!
या गरीब बिचाऱ्या कोंबडयाला
कोल्ही नेते भाजायला,
दाट जंगलाच्या पल्याड
खोल नदीच्या पल्याड
उंच डोंगराच्या पल्याड...





धाव मांजरा, धाव पक्ष्या
वाचवा गरीब कोंबडयाला!"

मांजराला आणि गाणाऱ्या पक्ष्याला कोंबडयाचा आक्रोश ऐकू गेला. ते घाईघाईने कोल्हीच्या पाठोपाठ गेले व तिच्यापासून कोंबडयाची सुटका करून त्याला घरी घेऊन आले.

दुसऱ्या दिवशी मांजर आणि गाणारा पक्षी जेव्हा लाकडे तोडायला परत रानात निघाले तेव्हा त्यांनी पुन्हा कोंबडयाला कडकपणे बजावले:

"कोंबडया, खिडकीतून अजिबात डोकावून पाहू नकोस. आम्ही आज पूर्वीपेक्षा आणखी लांब जाणार आहोत आणि तुझ्या आरोळ्या कदाचित आम्हाला ऐकायला यायच्या नाहीत."

पण ते दोघे गेले न गेले. तोच कोल्ही झोपडीजवळ हजर झाली व गाऊ लागली:

"कोंबडोबा कोंबडोबा
लाल तुरा तुझा छान,
पांढरीशुभ्र तुझी छाती
दाढी सुरेख रेशीमपोती,
दावशील मुखडा तुझा देखणा
तर देते पसाभर वाटाणा!"

पण कोंबडा घरात मुकाट बसून राहिला. तेव्हा कोल्ही पुन्हा गाऊ लागली:





"रस्त्यावरून धावली कारटी
सांडत गेली गव्हाची पोती,
भरभर टिपून गव्हाचे दाणे
कोंबड्यांनी संपवले मघाशीच
अन् कोंबडे राहिले उपाशीच!"

हे ऐकल्यासरशी कोंबडा चिडला आणि खिडकीतून मुंडके बाहेर काढून ओरडला:

"कॉक कॉक कॉक! कोंबडे का म्हणून राहतील उपाशी?"

तेवढ्यात कोल्हीने झडप घातली व कोंबड्याला बकोटीला मारून आपल्या बिळाकडे धूम ठोकली.

कोंबडा आक्रोश करू लागला:

"धावा हो धावा!
या गरीब बिचाऱ्या कोंबड्याला
कोल्ही नेते भाजायला,
दाट जंगलाच्या पल्याड
खोल नदीच्या पल्याड
उंच डोंगराच्या पल्याड...
धाव मांजरा, धाव पक्ष्या,
वाचवा गरीब कोंबड्याला!"





मांजराने आणि गाणाऱ्या पक्ष्याने कोंबड्याचा आक्रोश ऐकला व ते कोल्ह्यामागे धावले. मांजर जोराने पळत निघाले व पक्षी उडत निघाला आणि दोघांनी प्रयत्नांची शर्थ केली. त्यांनी कोल्हीला गाठले. मांजराने आपले पंजे वापरले, पक्ष्याने चोच वापरली आणि कोल्हीवर दोघांनी अटीतटीने चढाई केली. अखेरीस त्यांनी कोंबड्याला तिच्या तडाख्यातून सोडवून आणले.

काही काळानंतर मांजर आणि गाणारा पक्षी पुन्हा रानात लाकडे तोडायला निघाले. जाण्यापूर्वी त्यांनी अगदी कडक शब्दात कोंबड्याला बजावले:

"कोल्हीचं काही ऐकू नको आणि खिडकीतून डोकावू नको. आम्ही आज आणखी लांब जाणार आहोत आणि तू कितीही मोठ्यांदा ओरडलास तरी आम्हाला तुझ्या आरोळ्या ऐकू येणार नाहीत."

आणि ते निघून गेले. ते जातात न जातात तोच काय! कोल्ही तिथे दत्त म्हणून हजर! तिने खिडकीखाली बैठक मारली व ती गाऊ लागली:

"कोंबडोबा कोंबडोबा
लाल तुरा तुझा छान,
पांढरीशुभ्र तुझी छाती
दाढी सुरेख रेशीमपोती,
दावशील मुखडा तुझा देखणा
तर देते पसाभर वाटाणा!"





कोंबडा घरात मुकाट बसून राहिला. तेव्हा कोल्ही पुन्हा गाऊ लागली

रस्त्यावरून धावली कारटी
सांडत गेली गव्हाची पोती,
भरभर टिपून गव्हाचे दाणे
कोंबडयांनी संपवले मघाशीच
अन् कोंबडे राहिले उपाशीच!"

पण तरीही कोंबडा अगदी तोंडाला कुलूप लावून अळी मिळी गुप् चिळी बसला. तेव्हा कोल्हीने नवे गाणे सुरू केले:

"रस्त्यावरून धावले पुरुष
सांडत गेले भुईमूग,
भरभर टिपून भुईमुगाचे दाणे
कोंबडयांनी संपवले मघाशीच
अन् कोंबडे राहिले उपाशीच!"

कोंबडयाचे मौन संतापासरशी मोडले व मुंडके खिडकीबाहेर काढून तो ओरडला:

"कॉक कॉक कॉक! कोंबडे का म्हणून राहतील उपाशी?"

कोल्हीने झटदिशी कोंबडयाची मानगूट धरली व सरळ दाट जंगलाच्या





पल्याड, खोल नदीच्या पल्याड, उंच डोंगराच्या पल्याड आपल्या बिळाची वाट धरली.

कोंबडयाने बेंबीच्या देठापासून ओरडून आक्रोश केला, पण मांजराला आणि गाणाऱ्या पक्ष्याला त्याचे ओरडणे काही ऐकू गेले नाही. आणि जेव्हा ते घरी परत आले तेव्हा कोंबडा बेपत्ता होता.

मांजर आणि गाणारा पक्षी ताबडतोब कोल्हीच्या पाठलागावर निघाले. मांजर धावत होते आणि पक्षी उडत होता व दोघांनी प्रयत्नांची शर्थ केली. अखेरीस ते कोल्हीच्या बिळाजवळ येऊन पोचले. मांजराने आपले तंतुवाद्य सावरले व बोटांनी त्याच्या तारा छेडीत ते गाऊ लागले:

"झनन् झनन् झनन्
झंकारती सोनेरी तारा
विहीण कोल्हीबाई
अजून आली नाही घरा!"

कोल्हीने हे गाणे ऐकले. ती मनाशी म्हणाली: "कोण बाई एवढं सुरेख गातंय? फारा दिवसात असं ऐकलं नाही गाणं!"

कोण सुरेख गातेय हे पहायला कोल्ही आपल्या बिळातून बाहेर आली. तेवढयात मांजर आणि गाणारा पक्षी तिच्यावर तुटून पडले. त्यांनी तिला बदड बदड बदडले. एवढे चोपले की, कोल्ही बिळात परतली तेव्हा अर्धमेली झाली होती.





त्यानंतर मांजराने व गाणाऱ्या पक्ष्याने कोंबड्याला टोपलीत घातले आणि घरी आणले.

आणि त्या दिवसापासून ते तिघेही त्या जंगलातल्या झोपडीत सुखाने रहात आहेत.



